**नोंदणी व मुद्रांक विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदली/पदस्थापना याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आस्थाप-२०१४/५८०/प्र.क्र.१४०/म-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
तारीख: ३० एप्रिल, २०१५.

**वाचा :-**

**१) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.३१/०१/२०१४ व दि.१९/०१/२०१५**

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र. ८२/२०११ मध्ये दि.३१/१०/२०१३ रोजी दिलेल्या निदेशास अनुसरुन, शासनाने गट-अ, व गट-क मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापना करण्याबाबतचा निर्णय संदर्भाधिन शासन निर्णयान्वये घेतला आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार नोंदणी व मुद्रांक विभागातील गट-अ मधील नोंदणी उपमहानिरीक्षक, सह जिल्हा निबंधक वर्ग-१ (उच्च श्रेणी), सह जिल्हा निबंधक वर्ग-१ (निम्नश्रेणी) आणि गट-ब मधील सह दुय्यम / जिल्हा निबंधक वर्ग-२ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम अधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :

नोंदणी व मुद्रांक विभागातील गट-अ मधील नोंदणी उपमहानिरीक्षक, सह जिल्हा निबंधक वर्ग-१ (उच्च श्रेणी), सह जिल्हा निबंधक वर्ग-१ (निम्नश्रेणी) आणि गट-ब मधील सह दुय्यम / जिल्हा निबंधक वर्ग-२ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेबाबत तसेच महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियमातील तरतुदीनुसार बदलीबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) ची स्थापना करण्यात येत आहे :-

**नागरी सेवा मंडळ (१)**

| | | |
|---|---|---|
| १. | सचिव, मदत व पुनर्वसन | अध्यक्ष |
| २. | सचिव तथा संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग | सदस्य |
| ३. | नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |

२) नागरी सेवा मंडळ (१) सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासुन अस्तित्वात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१५२०१४७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: CN = Dinesh Rohidas Chavan, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.05.12 15:21:52 +05'30'

**(दिनेश चव्हाण)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. सचिव (मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई
२. मा. सचिव तथा संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
३. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे

**प्रत,**

४. सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक
५. सर्व सह जिल्हा निबंधक तथा मुद्रांक जिल्हाधिकारी
६. निवडनस्ती म-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

**प्रतिलिपी,**

७. मा. मंत्री (महसूल) / मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.